# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१७

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

### राज्यातील जिल्हा परिषद शाळांच्या विद्युत देयके लोकवर्गणीद्वारे भरणा करण्यात येत असल्याबाबत

**(१) ५५१४ (०८-०४-२०१५). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हा परिषदांच्या शाळांच्या विद्युत देयकांची रक्कम संबंधित गावाच्या ग्रामस्थांकडून लोकवर्गणी जमा करुन किंवा पाणी पट्टीच्या रक्कमेतून वळती करुन घेण्यात येत असल्याचे माहे जानेवारी, २०१५ च्या पहिल्या आठवडयात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शाळांच्या विद्युत देयकांच्या रक्कमा संबंधित ग्रामस्थांकडून वसूल करणे हे नियमानुसार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याप्रकरणी चौकशी करण्यात आली आहे काय व चौकशीनुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२४-११-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**ठाणे शहरातील पोखरण विभागातील रस्ता रुंदीकरणात बेघर झालेल्यांना घरे देण्याबाबत**

**(२) १७४५० (२८-०४-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे शहरातील पोखरण विभागातील रस्ता रुंदीकरणातून बेघर झालेल्या बेघरांना १२.५ टक्के दराने घरे देण्याचा निर्णय शासनाने माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर बेघरांना कोठे आणि किती कालावधीत घरे देण्यात येणार आहेत, त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-११-२०१७) :**

(१) व (२) रस्ता रुंदीकरणात बाधित पात्र निवासी बेघरांना बी.एस.यु.पी. अंतर्गत बांधण्यात आलेल्या गृहनिर्माण प्रकल्पात कायमस्वरुपी घरे देण्यात आली आहे. बी.एस.यु.पी. प्रकल्पाच्या मार्गदर्शक तत्वानुसार आणि शासन निर्णयानुसार लाभार्थी हिस्सा खुला गटासाठी १२%, मागासवर्गीय गटासाठी ५०% लाभार्थी हिस्सा अभिप्रेत आहे.

उर्वरीत बेघरांपैकी काही बेघरांना मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांतर्गत रेंटल हौसिंग स्कीममध्ये घरे देण्यात आली आहे. ठाणे महानगरपालिकेकडे कायमस्वरुपी घरे उपलब्ध झाल्यास उर्वरीत बेघरांना प्राधान्यक्रमाने नियमानुसार शुल्क आकारून ताबा देण्यात येणार असल्याचे ठाणे महानगरपालिकेने कळविले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## खाजगी अनुदानित मराठी शाळांसाठी करावयाची उपाययोजना

**(३) १८५९३ (२९-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे :** तारांकित प्रश्न क्रमांक ७३६६ ला दिनांक ३१ जुलै, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात गरीब विद्यार्थ्यांसाठी असलेल्या खाजगी अनुदानित शिक्षणाचा एक मोठा स्त्रोत कायमचा बंद होण्याच्या मार्गावर असल्याच्या पार्श्वभुमीवर राज्यात शैक्षणिक गुणवत्ता वाढीसाठी शासनाकडून प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र व सरल उपक्रम राबविण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, इंग्रजी माध्यमाच्या विनाअनुदानित शाळांना मोठ्या प्रमाणात मान्यता देण्यात येत असल्याने विद्यार्थ्यांअभावी मराठी माध्यमाच्या अनुदानित शाळांचे अस्तित्वाचाच प्रश्न निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मराठी माध्यम शाळांत विद्यार्थी संख्या मोठ्या प्रमाणात घटत असतानाच, संच मान्यता, तुकडी निर्धारण व शिक्षक मान्यतेसंबंधीच्या शासनाच्या मागील मोठ्या कालावधीतील सततच्या अस्थिर धोरणामुळे मराठी शाळा आणि मराठी शिक्षकांच्या समस्यांत वाढच होत असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, राज्यात मोठ्या प्रमाणात पेव फुटलेल्या विनाअनुदानित इंग्रजी माध्यमाच्या शाळांसाठी अनुदानित/विनाअनुदानित मराठी शाळांच्या धर्तीवरच मान्यतेचे सक्त धोरण ठरविणे व राज्यात महानगरपालिका / नगरपालिका /जिल्हापरिषद/इंग्रजी, मराठी-उर्दु सर्वच शाळांसाठी एकसुत्री समान शैक्षणिक धोरण अंमलात आणण्याच्यादृष्टीने शासनस्तरावरून कोणती कार्यवाही करण्यांत आली वा येत आहे,

(५) मोफत पाठ्य पुस्तके, गणवेश व पोषण आहार इ. उपायाव्यतिरिक्त मराठी शाळा व मराठी शिक्षकांचे अस्तित्व अबाधित राहणेचेदृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री. विनोद तावडे (२४-११-२०१७) :** (१) शैक्षणिक गुणवत्ता वाढीच्या हेतूने प्रगत महाराष्ट्र व सरल उपक्रम राबविण्यात येत आहेत.

(२) व (३) अंशत: हे खरे आहे.

(४) स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांना शासन निर्णय, दिनांक ११/०६/२००९ मधील तरतुदीनुसार परवानगी देण्यात येते. स्वयं-अर्थसहाय्यित तत्वावरील शाळांचे धोरण अधिनियमान्वये निश्चित केले आहे. त्यानुसार शाळांना परवानगी देण्यात येते.

(५) मराठी शाळा व मराठी शिक्षकांचे अस्तित्व अबाधित राहण्याच्यादृष्टीने शासन विविध उपक्रम राबवित आहे.

---

## राज्यात डायसच्या अहवालानुसार ६४ हजार शाळांमध्ये नियमित मुख्याध्यापक, तसेच भौतिक सोयी सुविधा नसल्याबाबत

**(४) १९३०३ (२३-०८-२०१६). श्री.हरिसिंग राठोड, डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात डायसच्या अहवालानुसार ६४ हजार ३६३ शाळा मध्ये नियमित मुख्याध्यापक नसल्याची माहिती माहे फेब्रुवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या अहवालानुसार १६३ शाळा मध्ये शिक्षक नाहीत शिक्षकाविना सर्वाधिक शाळा रत्नागिरी जिल्हयात आहेत,तसेच राज्यात ६ हजार ४७७ शाळांमध्ये वीज जोडणी नाही अशा सर्वाधिक शाळा बीड जिल्हयात आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शाळेमध्ये मुख्याध्यापकाचे पद रिक्त आहे, शिक्षक नाही, भौतिक सोयी सुविधा नसल्यामुळै बालकांचा मोफत सक्तीचा शिक्षणाचा अधिकाराची अंमलबजावणी होत नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदरहू रिक्त पदे भरण्याबाबत तसेच भौतिक सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री. विनोद तावडे (१४-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

मुख्याध्यापकांची सर्व पदे मंजूर पदे भरलेली आहेत.

(२) अंशत: खरे आहे.

राज्यात यू डायसच्या २०१५-१६ च्या सर्व्हेक्षणानुसार शिक्षक नसलेली एकही शाळा नाही. रत्नागिरी जिल्ह्यामध्ये शिक्षक नाहीत अशी एकही शाळा नाही.

राज्यात एकूण १०७६३३ शाळा असून १०११०९ शाळांमध्ये वीज जोडणी करण्यात आलेली आहे. बीड जिल्ह्यात एकूण ३६६९ शाळा आहेत. त्यापैकी ३२०५ शाळांना वीज जोडणी झालेली असून ९३१ शाळांना वीज जोडणी झालेली नाही.

(३) हे खरे नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील पोलीस कार्यालयांचे कामकाज पेपरलेस करण्याबाबत**

**(५) १९८२६ (२३-०८-२०१६). श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील पोलीस कार्यालयांचे कामकाज पेपरलेस करण्याचा निर्णय शासनाने माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तद्नुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१४-११-२०१७) :** (१) व (२) केंद्र शासनाच्या ई-गव्हर्नन्स योजनेंतर्गत व गुन्हेगारी मार्ग काढण्यासाठी नेटवर्क व यंत्रणा (Crime & Criminal Tracking Network and System- CCTNS) या प्रकल्पांतर्गत

राज्यातील एकूण १०५४ पोलीस ठाणे ६२९ वरिष्ठ कार्यालये नेटवर्कने जोडलेले असून, सदर पोलीस ठाण्यांमध्ये पुर्णपणे सी.सी.टी.एन.एस. प्रणालीमध्ये एफआयआर दाखल करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे. तसेच, राज्यातील नागरिकांसाठी मराठी व इंग्रजी भाषेत सिटीझन पोर्टल दि. ०६/०१/२०१६ पासून कार्यान्वित करण्यात आले आहे. सदर पोर्टलद्वारे हरविलेल्या व्यक्तींची नावे यांची माहिती, बेवारस मृतदेह तसेच इतर ४४ विविध प्रकारचे अर्जांचे नमूने नागरिकांना उपलब्ध करुन देण्यात आले आहे. तसेच, पुणे जिल्हयात प्रायोगिक तत्वावर नागरिकांसाठी ऑनलाईन तक्रार (e-complaint) देण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

त्याचप्रमाणे, महाराष्ट्र पोलीस दलाचे सर्व १० पोलीस आयुक्तालये व ३६ जिल्हा पोलीस कार्यालये तसेच, राज्य पोलीस दलाकरीता संकेतस्थळे विकसित करण्यात आली असून त्यावर महत्वाचे आदेश, परिपत्रक इत्यादी माहिती उपलब्ध करुन देण्यात येते.

महाराष्ट्र पोलीस दलाच्या कार्यालयातील दैनंदिन पत्रव्यवहार व माहितीची देवाण घेवाण करण्याकरिता ईमेल आयडिचा (mahapolice.gov.in) प्रभावी वापर करण्यात येत आहे.

महाराष्ट्र पोलीस दलाचे संपूर्ण संगणकीकरण कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय व इतर सर्व बाबींकरीता महाराष्ट्र पोलीस दलासाठी स्वतंत्र ९ संगणक प्रणाली विकसित करण्यात आली असून डी.जे.एम.एस. व व्हेईकल अँन्ड फ्लीट मॅनेजमेंट मॉडेल कार्यान्वित करण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**पोलिसांच्या हक्कांच्या रजांसाठीही कारण देण्याची सक्ती मागे घेणेबाबत**

**(६) २०३९२ (२३-०८-२०१६). श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई पोलिसांना हक्काची, अर्जित किंवा धनार्जित रजा हवी असेल तर रजेच्या अर्जासोबत लग्नपत्रिका, घराचा नगरपालिकेने मंजूर केलेला आराखडा

किंवा डॉक्टरचे प्रमाणपत्र सादर करा मगच रजेचा विचार केला जाईल असा निर्णय अप्पर आयुक्त, मुंबई पोलीस यांनी काढला असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पोलिसांच्या हक्कांच्या रजांसाठीही कारण देण्याची सक्ती मागे घेणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१६-११-२०१७) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शाळांमध्ये सोईसुविधा प्रामुख्याने मुलींना मिळत नसल्याने शाळांमध्ये विद्यार्थी गळती होत असल्याबाबत

**(७) २०६४४ (२५-०८-२०१६). श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शिक्षण हक्क कायद्यानुसार इयत्ता आठवीपर्यंत मोफत शिक्षण देणे बंधनकारक आहे, परंतु शिक्षण हक्क कायद्यातील तरतुदीप्रमाणे आवश्यक सोईसुविधा विद्यार्थ्यांना प्रामुख्याने मुलींना मिळत नसल्याने शाळांमध्ये विद्यार्थी गळती होत असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी विद्यार्थ्यांना सोईसुविधा मिळण्याबाबत मा.उच्च न्यायालयाच्या मुख्य न्यायमूर्तींनी शासनास दिलेल्या निर्देशानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२४-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) शासकीय व स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सर्व शाळांमध्ये किमान १ स्वच्छतागृह मुलांकरिता व १ स्वच्छतागृह मुलींकरिता उपलब्ध असल्याचे

आयुक्त, सर्व महानगरपालिका व मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व महानगरपालिका व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व जिल्हे यांनी दिनांक १५/०८/२०१५ पूर्वी प्रमाणित करुन दिले आहे. सर्व शिक्षा अभियान अंतर्गत सन २०१६-१७ मध्ये शाळेतील पटसंख्येनुसार मुलांकरिता १२६७ व मुलींकरिता ९३३ स्वच्छतागृहे मंजूर करण्यात आली आहेत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील उर्मट पोलीस कर्मचाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत**

**(८) २०८२२ (२३-०८-२०१६). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर : तारांकित प्रश्न क्रमांक १११११९ ला दिनांक १६ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) स्टेट क्राईम रेकॉर्ड ब्युरो (एससीआरबी) व नॅशनल रेकॉर्ड ब्युरो (एनसीआरबी) ने जाहीर केलेल्या गेल्या तीन वर्षाच्या आकडेवारीनुसार संपूर्ण राज्यातील १३८२ पोलिसांविरुध्द खटले चालविले गेले मात्र त्यापैकी एकच पोलीस दोषी ठरला असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कर्तव्यावर असताना उर्मटपणे वागणाऱ्या पोलीस कर्मचाऱ्यांवर खटले दाखल करताना त्यांच्याविरुध्द सबळ पुरावे देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०६-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे यांच्या क्राईम इन महाराष्ट्र या अहवालावरुन सन २०१२ ते २०१४ या तीन वर्षात पोलिसांविरुध्द दाखल गुन्ह्यांबाबतची सांख्यिकी माहिती खाली दर्शविल्याप्रमाणे आहे.

| वर्ष | दाखली केसेस | दोष सिध्द होवून शिक्षा झालेले पोलीस कर्मचारी |
|---|---|---|
| २०१२ | ३८० | ५ |
| २०१३ | ३८० | ७ |
| २०१४ | ४८७ | ३ |
| एकूण | १२४७ | १५ |

सन २०१२-२०१४ या कालावधीत एकूण १२४७ केसेस दाखल झालेल्या असून १५ प्रकरणात पोलिसांविरुध्द दोष सिध्द होवून त्यांना शिक्षा झालेली आहे.

(२) कर्तव्यावर असतांना उर्मट पोलीस कर्मचाऱ्यांवर गुन्हा दाखल करताना पोलिसांनी दिलेल्या सबळ पुराव्यामुळे उपरोक्त पोलिसांविरुध्द गुन्हे सिध्द झालेले आहेत.

ज्या पोलिसांविरुध्द न्यायालयात केसेस सुटलेल्या आहेत त्याबाबतच्या कारणांचा अभ्यास करुन सबळ पुरावे देऊन न्यायालयात केसेस सिध्द करण्याचा प्रयत्न करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**त्र्यंबकेश्वर (जि.नाशिक) येथे सिंहस्थ कामांतर्गत झालेली सिमेंट रस्त्यांची कामे निकृष्ट दर्जाची असल्याबाबत**

**(९) २३६९९ (३०-१२-२०१६). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) त्र्यंबकेश्वर (जि.नाशिक) येथे सिंहस्थ कामांतर्गत करण्यात आलेल्या १६ सिमेंट रस्त्यांचे काम निकृष्ट दर्जाचे झाले असल्याचे महाराष्ट्र अभियांत्रिकी, संशोधन संस्थेने (मेरी) केलेल्या तपासणीच्या निष्कर्षात समोर आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मेरीकडील निष्कर्षाचे पार्श्वभुमीवर प्रत्येक कामाची सखोल

चौकशी करण्यांत आली आहे काय, त्यात काय आढळून आले व त्यानुसार संबंधिताविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-११-२०१७)** : (१) सिंहस्थ कुंभमेळा मंजूर आराखड्यातील त्रिंबक नगरपरिषदेमार्फत करण्यात आलेल्या सर्व कॉंक्रीट रस्त्यांची गुणवत्ता तपासणी महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी) यांचेकडून कोअर नमुना पध्दतीने घेण्यात आली.

सदर चाचणीच्या प्राप्त निष्कर्षानुसार १६ कॉंक्रीट रस्त्यांचे निष्कर्ष अहवाल (Core strength) मानांकनानुसार प्राप्त झाले नसल्याचे निदर्शनास आले.
(२) चाचणीचे निष्कर्ष मानांकनानुसार नसलेल्या सदरहू १६ रस्त्यांचे भागातील कॉंक्रीट वर Injection grouting and epoxy layer with GP-२ treatment संबंधित मक्तेदाराकडून नगर परिषदेने करुन घेतली आहे. तसेच नगरपरिषदेने सिंहस्थ कामांसाठी नेमलेल्या वास्तुविशारद यांचेमार्फत सविस्तर दर पृथ्थकरण करुन त्यांचे अहवालानुसार Reduced Rate ने आकारणी करुन मक्तेदाराची देयके मंजूर केली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मोहाने (ता.कल्याण, जि.ठाणे ) एन.आर.सी. कंपनीतून होत असलेल्या भंगार चोरीतून कामगारांच्या हक्काच्या कोट्यावधी रुपयांची होत असलेली लुट**

**(१०) २४४०७ (०४-०१-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण (जि.ठाणे) येथील एन.आर.सी. या बंद पडलेल्या कंपनीतून ३० सप्टेंबर, २०१६ रोजी दुपारी ३.३० वाजता भंगार घेऊन जाणारा. एम.एच. ०६-एक्यू- ८३७७ या क्रमांकाचा ट्रक फरीदा रफिक पठाण या महिलेने खडकपाडा पोलीस स्टेशन, कल्याण (जि.ठाणे) येथे ट्रक ड्रायव्हर व एन.आर.सी. कंपनीचा एम.डी. शेखावत यांच्याविरोधात तक्रार करून पकडून दिलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू ट्रक मध्ये कोणकोणत्या प्रकारचे भंगार सामान आढळून आले व त्याचे सर्वसाधारण मुल्य काय होते,

(३) असल्यास, अशाच प्रकारे मागील अनेक महिन्यांपासून एन.आर.सी. कंपनीतून मोठ्या प्रमाणात भंगार चोरी होत असल्याची स्थानिक नागरिकांची माहिती असून कामगारांची देणी अद्याप मिळाली नसताना भंगार माफिया, कंपनीतील काही अधिकारी व स्थानिकांच्या मदतीने एन.आर.सी. कंपनीतील भंगाराची व आतील मौल्यवान धातूंच्या वस्तूंची चोरी करून नेत असल्याने या प्रकरणाची शासनाने चौकशी केली आहे काय,

(४) असल्यास, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०१-११-२०१७) :** (१) होय, सदरहू प्रकरणात फिर्यादी महिला व इतर यांनी भंगार चोरी प्रकरणी आरोपींना थांबवुन पोलीसांच्या ताब्यात देऊन ठाणे पोलीस आयुक्त परिसरातील परिमंडळ-३, कल्याण मधील खडकपाडा पोलीस स्टेशन येथे गु.र.क्र. ३१७/२०१६ भा.द.वि.कलम ३७९, ३४ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

सदर गुन्हयातील आरोपीत मदनसिंग शेखावत यांनी FIR रद्द होणेबाबत रिट पिटीशन नं. ३७४९/१६ दाखल केली असून मा. उच्च न्यायालयात प्रकरण प्रलंबित आहे. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी सदर गुन्हयाचा तपास पुढील आदेश होईपर्यंत थांबविणेबाबत आदेश केले आहेत.

(२) सदरहू गुन्हयात खालीलप्रमाणे मुद्देमाल जप्त करण्यात आला आहे.

अ) २०,००,०००/- रु. किमंतीचे भंगार पार्ट, शिश्याचे, ताब्याचे व इतर कि.सु.

ब) ५,००,०००/- रु. कि.चा टाटा कंपनीचा ट्रक एम.एच.०६-ए.क्यू.-८३७७ जु.वा.कि.सु.

(३) व (४) कंपनीतील भंगार चोरी प्रकरणी महात्मा फुले पोलीस ठाणे येथे सन २००९ ते २०१५ पर्यंत एकुण २४ गुन्हे दाखल असुन २० गुन्हयांत ७७ आरोपीं विरुध्द मा. न्यायालयात दोषारोप दाखल करण्यात आले आहे. तसेच कपंनीतील धातुच्या वस्तुची चोरी होऊ नये याकरीता कंपनीच्यावतीने खाजगी सुरक्षा यंत्रणा तैनात करण्यात आलेली आहे. पोलीस स्टेशन अंतर्गत बीट

मार्शल ची गस्त ठेवण्यात आलेली असुन भंगार चोरी करणारे मिळुन येताच त्यांचेवर योग्य ती कारवाई करण्यात येत आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**नागपूर शहरातील डब्बा गैरव्यवहाराबाबत**

**(११) २४४६४ (०४-०१-२०१७). श्री.प्रकाश गजभिये : तारांकित प्रश्न क्रमांक २२७२८ ला दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर शहरामध्ये डब्बाच्या नावाने ९००० कोटींचा गैरव्यवहार झाला असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, वरील डब्बा गैरव्यवहारामध्ये किती आरोपींना अटक केली, तसेच यात किती नागरीकांचे नुकसान झालेले आहे,
(३) असल्यास, उक्त प्रकरणाची चौकशी करून दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे
(४) असल्यास, सदरहू संपूर्ण प्रकरणाची सखोल चौकशी करण्यास सी.बी.आय.ची मदत घेतली जाणार आहे काय,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१६-११-२०१७) :** (१), (२) व (३) होय, हे खरे आहे.
नागपूर शहर पोलीस आयुक्तालय अंतर्गत आर्थिक गुन्हेशाखा, नागपूर शहर यांना माहिती मिळताच दि. १२ मे, २०१६ रोजी विविध १० ठिकाणी छापे टाकून अवैधरित्या डब्बा ट्रेडिंगचा व्यवसाय करणाऱ्या एकूण २६ आरोपीं विरुध्द ९ गुन्हे दाखल करुन १२ आरोपींना अटक केलेली आहे व १४ आरोपी अटकपूर्व जामीनावर आहेत. तपास सुरु असून सदर गुन्ह्यांत नागरिकांचे नुकसान झालेले नसुन आरोपीतांनी शासनाची फसवणूक केलेली आहे.
(४) सदर गुन्ह्याचा तपास आर्थिक गुन्हेशाखे मार्फत सुरु असून आवश्यकता भासल्यास मदत घेण्यात येईल.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील उत्पादन शुल्क विभागाच्या महसूलातील निधी दारु बंदीच्या जनजागृतीसाठी खर्च करण्याबाबत

**(१२) २५८७१ (१६-११-२०१६). श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **राज्य उत्पादन शुल्क मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात अवैध दारु विकणारा तीनदा पकडला गेला तर त्याच्यावर घातक कारवाया प्रतिबंध कायद्याखाली (एमपीडीए) कारवाई करण्यात येईल असे मा.राज्य उत्पादन शुल्क मंत्री यांनी माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान जाहिर केले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्य उत्पादन विभागाच्या महसूलातून काही निधी दारु बंदीच्या जनजागृतीसाठी राखून ठेवून खर्च करण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, किती विक्रेंत्यावर कारवाई तसेच दारु बंदीच्या जनजागृतीसाठी किती निधी उपलब्ध करुन देण्यात आला वा येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (१४-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व्यसनमुक्तीच्या जनजागृतीसाठी समाज कल्याण विभागामार्फत उपाययोजना केली जाते. राज्य उत्पादन शुल्क विभागाद्वारे दारुबंदीच्या जनजागृतीसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला नाही.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिनांक १७/०८/२०११ च्या शासन निर्णयान्वये राज्याचे व्यसनमुक्ती धोरण जाहीर केले आहे. व्यसनमुक्ती योजनेची माहिती शहरी व ग्रामीण भागातील जनतेपर्यंत पोहचविण्यासाठी व त्याचा लाभ त्यांना घेता यावा या उद्देशाने या योजनांना व्यापक प्रसिध्दी देण्यासाठी टि.व्ही., बस, लोकल इत्यादी विविध माध्यमांद्वारे जाहिरातीचे प्रसारण केले जाते.
(३) एप्रिल, २०१६ ते डिसेंबर, २०१६ या कालावधीत राज्य उत्पादन शुल्क विभागाने अवैध दारुची निर्मिती/ विक्री/ वाहतुक करणाऱ्यांविरुध्द ३३८४७ गुन्हे

नोंदवून १८१४७ आरोपींना अटक केली आहे.

व्यसनमुक्तीच्या जनजागृतीसाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडे सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षात रु. १३.०० कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**नांदेड येथील पोलिसांने आरोपीकडून लाच स्वीकारल्याबाबत**

**(१३) २७४०० (१३-०४-२०१७). श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड येथील पोलिसांने आरोपीकडून त्याच्या आईचे मंगळसूत्र विकून लाच स्वीकारल्याची घटना दिनांक २० जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार सदर पोलिसांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२७-११-२०१७) :**(१), (२) व (३) आरोपी लोकसेवक उधव गोविंदराव घुले, पोलीस हवालदार, पोलीस ठाणे उमरी, जिल्हा-नांदेड यांनी खासगी व्यक्ती मार्फत दिनांक १६ जानेवारी, २०१७ रोजी लाच स्विकारली असल्याने त्यांच्या विरुध्द भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम १९८८ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला असुन मा. न्यायालयात दोषारोप पत्र दाखल करण्यात आले आहे. तसेच आलोसे श्री. घुले यांना शासन सेवेतुन निलंबित करण्यात आले आहे.

---

**मुंब्रा (जि.ठाणे) शहरातील रस्त्यांच्या अपूर्ण कामांमुळे नागरिकांची गैरसोय होत असल्याबाबत**

**(१४) २९०६२ (१३-०४-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंब्रा (जि.ठाणे) येथील ५४ रस्त्यांच्या कामांना आयुक्त, महानगरपालिका ठाणे यांनी स्थगिती दिली असल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंब्रा शहरातील ५४ रस्त्यांपैकी २९ रस्ते खोदण्यात आले असुन त्यामुळे मुंब्रावासियांची गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-११-२०१७) :**(१) अंशत: खरे आहे.

ठाणे महानगरपालिकेच्या सक्षम प्राधिकरणाने मुंब्रा प्रभाग समिती अंतर्गत, ४४ रस्त्यांची कामे करण्याकरीता प्रशासकीय व वित्तीय मान्यता दिली असून, सदर रस्त्यांच्या कामांना कार्यादेश देऊन कामे सुरू करण्यात आली होती.

तथापि, प्रशासकिय कारणास्तव सदर ४४ रस्त्यांपैकी सुरू केलेल्या २ रस्त्यांची कामे वगळून ४२ कामांना नियोजनाच्या दृष्टीने ठाणे महानगरपालिकेने दिनांक २२/१२/२०१६ रोजी तात्पुरती स्थगिती दिली होती.

(२) हे खरे नाही.

ठाणे महानगरपालिकेने दिलेली तात्पुरती स्थगिती दिनांक ०३/०१/२०१७ रोजी मागे घेतली आहे. सद्यस्थितीत एकूण ४४ रस्त्यांपैकी ३४ रस्त्यांची कामे पुर्ण झालेली आहेत. उर्वरित रस्त्यांची कामे सुरू असून प्रगतीपथावर आहेत.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**अकोला शहरात गटसाधन केंद्रात लेखाधिकारी नियुक्त करण्याबाबत**

**(१५) २९२२९ (१२-०४-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला शहरातील सर्वशिक्षा अभियानातून शाळांना दिल्या जाणाऱ्या कोट्यवधी रुपये खर्चाच्या हिशेबासाठी गटसाधन केंद्रांमध्ये लेखाधिकारीच नसल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त अभियानाच्या होत असलेल्या खर्चावर पर्यवेक्षण, नियंत्रण करण्यासाठी अधिकारी नसल्याने गोंधळ होण्याची शक्यता निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, गटसाधन केंद्रात लेखाधिकारी नियुक्त न करण्याची कारणे काय आहेत व उक्त गटसाधन केंद्रात लेखाधिकारीची नियुक्ती कधीपर्यंत होणे अपेक्षित आहे ?

**श्री. विनोद तावडे (२२-११-२०१७) :** (१) नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात सर्व प्राथमिक शाळांमध्ये एक इंग्रजी शिक्षण सक्तीचे करण्याबाबत**

**(१६) ३०००८ (१२-०४-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सर्व प्राथमिक शाळांमध्ये इंग्रजी शिक्षण सक्तीचे करुन सर्व ६६१२ गटांमध्ये इंग्रजी माध्यमात शिक्षण देणारी किमान एक शासकीय शाळा असावी अशी शिफारस शिक्षण आणि सामाजिक विकासाच्या सचिव गटाने मा.पंतप्रधानांना केल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर शिफारशीची शासनाने दखल घेवून सर्व प्राथमिक शाळेत इंग्रजी शिक्षण सक्तीचे करुन प्रत्येक ब्लॉकमध्ये किमान एक इंग्रजी शाळा सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१०-११-२०१७) :** (१) होय.
(२) स्वयं अर्थसहाय्यित तत्वावर प्रत्येक ब्लॉकमध्ये एक किंवा एकापेक्षा अधिक इंग्रजी शाळा कार्यरत आहे.
(३) प्रश्न उद्‍भवत नाही.

---

**शिंदी खुर्द (ता.माण, जि.सातारा) येथील शेतक-याने आत्महत्या केल्याबाबत**

**(१७) ३०४६३ (१५-०४-२०१७). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शिंदी खुर्द (ता.माण, जि.सातारा) येथील पतसंस्थेने मंजूर केलेले कर्ज नोटाबंदीमुळे उपलब्ध न झाल्याने श्री.संजय विनायक भोसले या शेतकऱ्याने विषप्राशन करुन आत्महत्या केली असल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन दोषींवर कारवाई व आत्महत्या केलेल्या शेतक-यांच्या कुटूंबियांना आर्थिक मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देशमुख (०९-११-२०१७) :** (१) श्री. संजय विनायक भोसले या शेतकऱ्याने दिनांक ३१/१२/२०१६ रोजी आत्महत्या केली आहे.

संबंधीत शेतकऱ्याने १) प्रियदर्शनी ग्रामीण बिगरशेती सहकारी पतसंस्था मर्या. दहिवडी, शाखा मलवडी व २) सिद्धनाथ नागरी सहकारी पतसंस्था मर्या. दहिवडी, शाखा मलवडी या दोन पतसंस्थांकडील कर्जाच्या थकबाकीमुळे व

त्यांचे वडील श्री. विनायक भोसले यांचे नावावरील विविध कार्यकारी सहकारी सेवा सोसायटी मर्या., शिंदी खुर्द, ता.माण या सोसायटीच्या कर्जामुळे आत्महत्या केली असल्याचा जबाब या प्रकरणातील साक्षीदारांनी पोलिस उपनिरिक्षक, दहिवडी पोलिस स्टेशन, ता.माण यांचेकडे दिला आहे. मात्र या वरील तीनही संस्थांनी संबंधीतांवर कर्जवसूलीसाठी सक्तीची कारवाई केलेली नाही.

(२) कर्जबाजारीपणामुळे आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या वारसांना अर्थसहाय्य देण्यासाठी महसूल व वन विभागाने दिनांक २३/०१/२००६ रोजी शासन निर्णय निर्गमीत केला आहे. त्याअनुषंगाने प्रकरणाची चौकशी करण्यात आली असून वरील शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदर प्रकरण अर्थसहाय्य देण्यासाठी अपात्र असल्याचा निर्णय जिल्हाधिकारी, सातारा यांचे अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीने त्यांच्या दिनांक ०६/०३/२०१७ रोजीच्या बैठकीमध्ये घेतला आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कोल्हापूर जिल्हयात तालुकानिहाय क्रीडा संकूल उभारणीसाठी निधी उपलब्ध करण्याबाबत

**(१८) ३०९१२ (१०-०८-२०१७). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोल्हापूर जिल्हयात तालुकानिहाय क्रीडा संकूल उभारणीसाठी शासनाकडून निधीची तरतुद केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तालुकानिहाय क्रीडा संकूलांच्या उभारणीची सद्य:स्थिती काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२७-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) तालुकानिहाय क्रीडा संकूलांच्या उभारणीची सद्य:स्थिती खालीलप्रमाणे आहे.

**१. तालुका क्रीडा संकुल, राधानगरी -**

राधानगरी येथील गट क्र.७२७ पैकी १.२० हेक्टर इतकी जागा प्राप्त असून बांधकामासाठी रु.१००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीतून बॅडमिंटन हॉलचे काम पुर्ण झाले असून, संरक्षक भिंतीचे काम हाती घेण्यात आलेले असून सदर काम प्रगतीपथावर आहे. उर्वरित निधीमधून संरक्षक भिंतीचा दुसरा भाग, २०० मी. धावनमार्ग, प्रसाधनगृह, विविध खेळाची मैदाने, अंतर्गत रस्ते इ. कामे पुर्ण करुन घेणेसाठी सा.बा.विभागाकडे निधी वर्ग करण्याची कार्यवाही चालु आहे.

**२. तालुका क्रीडा संकुल, गगनबावडा -**

गगनबावडा येथील सर्वे नं.५७० मधील १७५०० चौ.मी. इतकी जागा प्राप्त असून बांधकामसाठी रु.१००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीतुन २०० मी. धावनपथ, बास्केटबॉल, खो-खो, कबड्डी मैदान इ. कामे पूर्ण करण्यात आलेली आहेत. दुस-या टप्प्यातील कामे हाती घेणे करिता संकुल समितीच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे कडून अंदाजपत्रक आराखडे तयार करण्याच्या अनुषंगाने सदर जागेचा सर्वे करण्यात येत आहे.

**३. तालुका क्रीडा संकुल, भुदरगड - गारगोटी -**

गारगोटी येथील भु.मा.क्र.१०३४ पैकी १.१३ हेक्टर इतकी जागा प्राप्त असून बांधकामासाठी रु.९३.०४ लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीतून बॅडमिंटन हॉलचे काम पूर्ण करण्यात आले असून उर्वरित कामे बहुउदेशिय हॉल, विद्युतीकरण, चेजिंगरुम, प्रसाधगृह, कार्यालयीन इमारत, व्यायामशाळाचे अपुर्ण काम सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करुन घेण्याचा निर्णय संकुल समितीने घेतलेला असुन त्यानुसार याबाबत कार्यवाही चालु आहे.

**४.तालुका क्रीडा संकुल, आजरा -**

आजरा येथे गट क्रं.३३५ पैकी ३.६० हेक्टर इतकी जागा प्राप्त असून बांधकामसाठी रु.८७.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीमधुन दि.१७/०८/२०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये संकुलाच्या संरक्षक भिंतीच्या कामास मान्यता देण्यात आलेली असुन त्यानुसार सा.बा.विभागामार्फत संरक्षक भिंतीचे काम करुन घेणे करिता निधी वर्ग

करण्याची कार्यवाही चालु आहे.

**५. तालुका क्रीडा संकुल, चंदगड -**

चंदगड येथे गट नं.६१० पैकी १.०० हेक्टर इतकी जागा प्राप्त असून बांधकासाठी रु.७८.०८ लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. तसेच बॅडमिंटन हॉल व मैदान सपाटीकरण या बाबी करिता रु.४२.०० लक्ष इतकी रक्कम खर्च झालेली असून हॉलचे काम अंतिम टप्यात आहे.

**६. तालुका क्रीडा संकुल, करवीर (निगवे दुमला) -**

निगवे दुमला येथील गट क्रं.३२२ पैकी २.०० हेक्टर इतकी जागा प्राप्त असुन, बांधकामसाठी रु.७५.६२ लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीतुन बॅडमिंटन हॉल, विविध खेळाची मैदाने, बास्केटबॉल, व्यायामशाळा , संरक्षक भिंत या सुविधा विकसित करण्यात आलेल्या आहेत.

**७. तालुका क्रीडा संकुल,करवीर (बाचणी) -**

सदर तालुका क्रीडा संकुलासाठी बाचणी येथे गट क्र.३५४ पैकी २.३९ हेक्टर इतकी जागा प्राप्त असून बांधकामासाठी रु.६५.०० लक्ष निधी माहे जून २०१७ मध्ये वर्ग करण्यात आलेले आहे. सदर निधी सा.बा.विभागाकडे वर्ग करण्यात येवून सदर तरतुदी मधून हाती घ्यावयाच्या कामाचे अंदाजपत्रक व आराखडे सा.बा.विभागाकडुन करुन घेण्याची कार्यवाही चालु आहे.

**८. तालुका क्रीडा संकुल, हातकणंगले हुपरी -**

हुपरी येथील गट क्रं.२६.५६ पैकी १००५६ इतकी जागा प्राप्त असून बांधकामासाठी रु.५०.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीतून बॅडमिंटन हॉल व मैदानाचे सपाटीकरण इ. कामे झालेली आहेत. दुस-या टप्यातील कामे हाती घेणे करिता अंदाजपत्रक व आराखडे तयार करण्याची कार्यवाही संकुल समितीमार्फत चालु आहे.

**९. तालुका क्रीडा संकुल, शाहुवाडी -**

बांबवडे येथील गट क्रं.९३ पैकी १.०७ हेक्टर इतकी जागा प्राप्त असून बांधकामासाठी रु.३५.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीतुन २०० मी.धावनपथ, विविध खेळाची मैदाने इ. कामे झालेली आहेत. दुस-या टप्यात संरक्षक भिंतीचे बांधकाम हाती घेणे करिता अंदाजपत्रक तयार करण्यात आलेले असुन सदर कामाकरिता सा.बा.विभागाकडे निधी वर्ग करण्याची कार्यवाही चालु आहे.

**१०. तालुका क्रीडा संकुल, गडहिंग्लज -**

गडहिंग्लज येथील गट नं.५६६ पैकी ४.०० हे. इतकी जागा प्राप्त असून बांधकामासाठी रु.१०.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आलेले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाकडून संकुलाचे बांधकाम अंदाजपत्रक व आराखडे तयार करुन घेण्याची कार्यवाही संकुला समिती मार्फत सुरु आहे.

**११. तालुका क्रीडा संकुल, हातकणंगले -**

अद्याप जागा प्राप्त झालेली नसुन जागा उपलब्धतेसाठी तहसिलदार, हातकणंगले यांना दि. ०२/०५/२०१७ रोजीच्या पत्रान्वये विनंती केलेली आहे.

**१२. तालुका क्रीडा संकुल, पन्हाळा व कागल -**

सदर दोन्ही संकुलांना अद्याप जागा अप्राप्त असुन जागा प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही संकुल समिती मार्फत सुरु आहे.

**१३. तालुका क्रीडा संकुल, शिरोळ -**

सदर तालुका क्रीडा संकुलास शिरोळ येथील भुमापन क्र.८९९ मधिल जागा उपलब्धतेसाठी तहसिलदार ,शिरोळ यांना दि. ०२/०५/२०१७ रोजीच्या पत्रान्वये विनंती केलेली आहे. परंतु अद्याप जागा अप्राप्त आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील विविध माथाडी कामगार मंडळातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(१९) ३०९६४ (११-०८-२०१७). श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विविध माथाडी कामगार मंडळे आणि विशेषत: नवी मुंबईतील किराणा बाजार व दुकाने मंडळ तसेच फळे व भाजीपाला असंरक्षित कामगार मंडळातील प्रशासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांची पदे रिक्त असून गेल्या १० वर्षापासून रिक्त पदे भरण्यात आली नसल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, किराणा बाजार व दुकाने मंडळात पूर्वी १०६ अधिकारी व कर्मचारी कार्यरत होते परंतु, १० वर्षापासून बरेच कर्मचारी निवृत्त झाल्याने मंडळाच्या कार्यालयाचा भार सध्या फक्त ४३ कर्मचारी सांभाळत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार रिक्त पदे भरणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (०२-११-२०१७)** : (१), (२), (३) व (४) राज्यात ३७ माथाडी मंडळे गठीत करण्यात आलेली असून त्यापैकी ३६ माथाडी मंडळातील मंजूर पदापैकी ३१५ पदे रिक्त आहेत.

नवी मुंबईतील किराणा बाजार व दुकाने मंडळ आणि भाजीपाला असंरक्षित कामगार मंडळ या दोन्ही मंडळात प्रशासकीय अधिकारी हे पद मंजूर नाही.

किराणा बाजार व दुकाने मंडळामध्ये एकूण १०२ कर्मचारी कार्यरत होते. सन-२०१२ मध्ये मंडळाच्या कामकाजाचा आढावा घेऊन एक सदस्यीय मंडळाने आवश्यक कर्मचाऱ्यांची संख्या ७० निश्चित केली. मंडळाच्या आस्थापनेवर सुरुवातीपासून असलेले कर्मचारी सेवानिवृत्ती, राजीनामा व इतर कारणांमुळे कमी झाले आहेत. सदर कर्मचाऱ्यांपैकी काही कर्मचाऱ्यांना अतिरिक्त कार्यभार देण्यात आला आहे व सद्य:स्थितीत रिक्त पदावर बाहय यंत्रणेमार्फत तात्पुरत्या स्वरुपात कर्मचारी भरती प्रक्रिया सुरु करण्यांत आलेली आहे. माथाडी मंडळाकरिता मंडळनिहाय आकृतीबंद तयार करुन याबाबत शासन स्तरावरुन मंजूरी देण्याची प्रक्रिया सुरु आहे.

---

**शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) यांच्याकडील कामाचा ताण कमी करण्याबाबत**

**(२०) ३०९७९ (१०-०८-२०१७). ॲड.निरंजन डावखरे** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यामध्ये शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) ची किती पदे मंजुर असून किती पदे कार्यरत आहेत, तसेच  शिक्षणाधिकारी (निरंतर) पदाची वेतनश्रेणी शिक्षणाधिकारी (प्राथमिक व माध्यमिक) पदाची वेतनश्रेणी समान आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) यांच्याकडे इतर शिक्षणाधिकारीप्रमाणे कामाचा ताण कमी असल्याने त्यांना शिक्षणाधिकारी (प्राथमिक) किंवा (माध्यमिक कनिष्ठ), शालेय शिष्यवृत्ती, प्रशिक्षण, विद्यार्थी संबंधित समस्या, परिक्षा, सर्वशिक्षा अभियान, संगणक प्रणाली मधील सर्व कामकाज, इत्यादी दिल्यास शिक्षणाधिकारी (प्राथमिक व माध्यमिक) यांच्यावर असलेला कामाचा ताण कमी होईल, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२३-११-२०१७) :** (१) राज्यामध्ये शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) ची एकूण ३० पदे मंजूर असून १८ पदे कार्यरत आहेत. शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) व शिक्षणाधिकारी (प्राथमिक व माध्यमिक) पदाची वेतनश्रेणी समान आहे, हे खरे आहे.

(२) सद्य:स्थितीत असा कोणताही प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन नाही. महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ संवर्गातील पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या निश्चित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील सुशिक्षित बेरोजगारांना रोजगार मिळवून देण्याबाबत**

**(२१) ३१२५० (११-०८-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात कौशल्या विकास व रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्रामध्ये नोंद झालेल्या सुशिक्षित तरुणांची संख्या २५ लाखांपेक्षा जास्त असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सुशिक्षित शेतमजूर, माथाडी कामगारांची संख्या सुमारे ५० लाखांपेक्षा जास्त आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या बेरोजगारांना रोजगार मिळवून देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (०६-११-२०१७) :** (१) राज्यातील कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्रात सुशिक्षित उमेदवारांच्या नोंदणीपटानुसार जुलै, २०१७ अखेर ३४,४२,४८० उमेदवारांची नोंदणी करण्यात आली आहे.

(२) हे खरे नाही.

तथापि, राज्यातील विविध ३६ माथाडी मंडळांमध्ये सुमारे २,१०,००० इतके माथाडी कामगारांची नोंदणी करण्यात आलेली आहे.

(३) सुशिक्षित बेरोजगारांना रोजगार मिळावा म्हणून कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्राचे संगणकीकरण, ग्रंथालय सदृश्य अभ्यासिका, बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था स्थापन करणे, आदिवासी उमेदवारांसाठी कौशल्य विकास, रोजगार माहिती व मार्गदर्शन प्रशिक्षण केंद्र, रोजगार प्रोत्साहन कार्यक्रम, व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र, प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान इत्यादी योजना राबविण्यात येतात.

(४) प्रश्न उद्भवत नाही

---

## राज्यातील विविध विद्यापीठे व मान्यता प्राप्त संलग्न महाविद्यालयातील शिक्षक-शिक्षकेतरांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२२) ३१३३८ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विद्यापीठे व मान्यता प्राप्त संलग्न अनुदानित कला, विज्ञान व वाणिज्य वरिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक-शिक्षकेतरांची रिक्त पदे भरण्याच्या अनुषंगाने दिनांक १ ऑक्टोबर, २०११ च्या विद्यार्थी संख्येवर आधारित पदनिश्चितीनुसार पदाच्या आढाव्यास मंजुरी घेण्याची सुरु असलेली कार्यवाही पुर्ण झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रस्तुत पदाच्या आढाव्यास मंजुरी प्राप्त झाली आहे काय व त्यानुषंगाने विविध विद्यापीठे व मान्यता प्राप्त संलग्न वरिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक-शिक्षकेतरांची रिक्त पदे भरण्याबाबत कोणता निर्णय घेण्यात आला,

(३) असल्यास, राज्यातील मान्यता प्राप्त संलग्न अनुदानित कला, विज्ञान व वाणिज्य वरिष्ठ महाविद्यालयात सेवानिवृत्ती, मृत्यू, स्वेच्छानिवृत्ती व अन्य तत्सम कारणाने रिक्त होणाऱ्या शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या एकुण पदांपैकी फक्त ४% शिक्षकेतरांची पदे भरण्यास शासनाकडून निर्देशित करण्यात आले असून वरिष्ठ महाविद्यालयात एकूण रिक्त पदांपैकी केवळ ४ % पद भरण्याच्या प्रचलित धोरणामुळे लिपिक, ग्रंथालय परिचय, शिपाई, प्रयोगशाळा सहाय्यक इत्यादी शिक्षकेतरांची पदे रिक्त असल्याने त्याचा दैनंदिन कार्यालयीन कामकाज तसेच ग्रंथालय, प्रयोगशाळा व महाविद्यालयाच्या स्वच्छतेच्या कामावर प्रतिकुल परिणाम होत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षकेतरांच्या रिक्त पदांमुळे महाविद्यालयाची शैक्षणिक गुणवत्ता कमी होऊन त्याचा नॅक मुल्यांकनावरही अनिष्ट परिणाम होत असून महाविद्यालयाच्या दैनंदिन, शैक्षणिक व कार्यालयीन कामकाजावर होत असलेला परिणाम पाहता वरिष्ठ महाविद्यालयातील शिक्षकेतरांची एकूण रिक्त पदे किमान ५० % भरण्यास अनुमती देवून शिक्षक-शिक्षकेतरांची सर्व रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०९-११-२०१७)** : (१) व (२) राज्यातील अकृषि विद्यापीठांशी संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयामध्ये कार्यरत असलेल्या शिक्षक व शिक्षकेतर पदांच्या आढाव्यास तसेच दिनांक ०१/१०/२०१५ च्या विद्यार्थीसंख्येवर आधारीत अशासकीय अनुदानित

महाविद्यालयातील अनुज्ञेय होणाऱ्या शिक्षक व शिक्षकेतर पदांच्या आढाव्यास मंजूरी घेण्याची कार्यवाही अद्याप पूर्ण झालेली नाही.

(३) व (४) वित्त विभागाने दिनांक ०२/०६/२०१५ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील ३ (क) मध्ये नमूद केलेल्या संवर्गाव्यतिरिक्त इतर संवर्गातील सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त असणाऱ्या पदांपैकी ५० टक्के किंवा एकूण संवर्गाच्या ४ टक्के यापैकी जे कमी असेल इतकीच पदे भरण्याची तरतूद विहीत करण्यात आली. तथापि, विभागाचा पदांचा आढावा मंजूर न झाल्यामुळे तसेच वित्त विभागाने तद्नंतर दिनांक २५/०५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाकडून आकृतिबंध अंतिम मंजूर न झालेल्या विभागास नवीन पदनिर्मिती, पदभरती करण्यास तसेच तोपर्यंत पदे रुपांतरित करण्यासही अनुमती नाकारण्यात आली. त्यानंतर वित्त विभागाच्या दिनांक २९/०६/२०१७ च्या शासन निर्णयान्वये अनुदानित संस्थाकडील पदांचा आकृतिबंध निश्चित करण्यासाठी मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे देण्यात येतील असे स्पष्ट करण्यात आले असून अद्याप तशा सूचना प्राप्त झालेल्या नाहीत. महाविद्यालयातील शिक्षकेतरांची पदे रिक्त असल्याने त्याचा दैनंदिन कार्यालयीन कामकाजावर प्रतिकूल परिणाम होत असल्याची तक्रार संचालनालयास प्राप्त झाली नसल्याचे संचालनालयाने कळविले आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**ठाणे हेल्थ केअर रुग्णालयाने एटीएम कार्डद्वारे बिलाची रक्कम ठेवल्याबाबत**

**(२३) ३१५२० (०९-०८-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे हेल्थ केअर रुग्णालयाने एटीएम कार्डद्वारे बिलाची रक्कम ठेवण्याचा प्रकार माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर रुग्णालयावर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**वसई-विरार-नालासोपारा (जि.पालघर) येथे फेरीवाल्यांनी ग्राहकांची फसवणूक केल्याबाबत**

**(२४) ३१५३८ (११-०८-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई-विरार-नालासोपारा (जि.पालघर) येथे फेरीवाले वैद्यमापनाच्या ऐवजी दगड वापरून ग्राहकांची फसवणूक करीत असून वैद्यमापन अधिकारी याकडे दुर्लक्ष करीत असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन ग्राहकांची फसवणूक करणाऱ्या फेरीवाल्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीश बापट (०९-११-२०१७) :**(१) हे खरे नाही.
(२) याबाबत तक्रार प्राप्त नसतानाही निरीक्षक, वैध मापन शास्त्र, वसई विभाग यांनी एप्रिल, २०१६ ते एप्रिल, २०१७ या कालावधीत वसई-विरार नालासोपारा येथील ६४ फेरीवाल्यांवर त्यांच्याकडील वजने व मापे याची विहीत मुदतीत फेरपडताळणी व मुद्रांकन करून न घेतल्यामुळे कारवाई केली आहे. तसेच याच कालावधीत वसई विरार नालासोपारा येथील १३६ फेरीवाले यांच्याकडील ५८२ वजन मापांची फेरपडताळणी व मुद्रांकन करून रू. ८,१६०/- पडताळणी व मुद्रांकन शुल्क वसूल केले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर शहरातील कामगार कल्याण केंद्र येथील स्विमींग पुलाची दुरूस्ती करण्याबाबत

**(२५) ३१८५६ (११-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.मितेश भांगडिया :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर शहरातील कामगार कल्याण केंद्र येथील स्विमींग पूल मधील टाईल्स जागोजागी उखडल्या असल्याने स्विमींग पुलमध्ये येणा-या नागरिकांच्या पायांना दुखापती होत असल्याचे दिनांक १२ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर स्विमींग पुलाच्या टाईल्सच्या दुरूस्तीचे काम करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (०२-११-२०१७) :**

(१) होय.

(२) व (३) सदर जलतरण तलावाची दुरुस्ती मंडळाने माहे जून, २०१७ मध्ये करुन घेतली आहे.

---

## आदिवासी विकास आयुक्तालय नाशिक येथील जिल्हा उपाध्यक्ष यांनी मदय पिऊन शिवीगाळ केल्याबाबत

**(२६) ३१८७५ (१९-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक येथे आदिवासी विकास आयुक्तालयात माहिती अधिकाराच्या नांवाने अधिकारी व कर्मचाऱ्यांना धमकावण्याच्या उद्देशाने मद्यधुंद अवस्थेत महाराष्ट्र शिक्षक आणि शिक्षकेतर परिषदेचे नाशिक जिल्हा अध्यक्ष व समता परिषदेचे नाशिक जिल्हा उपाध्यक्ष, प्रविण महाजन यांनी शिवीगाळ केल्याचे दिनांक २६ एप्रिल, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रविण महाजन हे संघटनांच्या नांवाने विविध शासकीय-निमशासकीय आस्थापना/संस्था/शिक्षण संस्था व उपक्रमांचे ठिकाणी गैर उद्देशाने माहितीचे अर्ज करून माहिती अधिकाराचा गैरवापर करत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, श्री.महाजन यांची चौकशी करण्यात आली आहे काय, चौकशीत काय निष्पन्न झाले व त्यांचेविरुध्द कोणती कायदेशीर कारवाई करण्यात आली वा येत आहे,

(४) असल्यास, माहिती अधिकाराचा गैरवापर करणाऱ्यांविरुध्द कारवाई होण्यासंदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विष्णु सवरा (०७-११-२०१७)** : (१) होय, हे खरे आहे.

(२) श्री. प्रविण महाजन या वैयक्तिक नावाने माहितीच्या अधिकाराखाली अनेक अर्ज प्राप्त झाले आहेत. तथापि, त्यामध्ये कोणत्याही संघटनेचा उल्लेख नाही. तसेच श्री.महाजन हे माहिती अधिकाराचा गैरवापर करित आहेत किंवा कसे हे ठरविण्याची बाब संबंधित कार्यालयाच्या अखत्यारित येत नाही.

(३) श्री.महाजन यांना गैरवर्तनाबद्दल दि. २६/०४/२०१६ रोजी पोलीस स्टेशन, मुंबई नाका, नाशिक यांच्या ताब्यात देण्यात आलेले होते. तसेच आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी दि. २६/०४/२०१६ च्या पत्रान्वये श्री.महाजन यांच्याविरूद्ध शासकीय कामकाजात अडथळा आणल्याप्रकरणी गुन्हा दाखल करण्याची विनंती संबंधित पोलीस अधिकाऱ्यांना केली आहे.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या पदस्पर्शाने पावन झालेल्या स्थळांचा विकास करण्याबाबत**

**(२७) ३२२४७ (१९-०८-२०१७). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या पदस्पर्शाने पावन झालेल्या व सामाजिक समतेच्या लढयाशी संबंधित असलेल्या २८ स्थळांचा विकास करण्याचा निर्णय शासनाने माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निर्णयाचे स्वरुप काय आहे, त्यानुसार कोणत्या स्थळांचा व कशाप्रकारे विकास करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, उपरोक्त २८ स्थळांचा विकास करण्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे व त्यापैकी प्रत्यक्षात किती निधी उपलब्ध करण्यात आला आहे, निधी उपलब्ध होऊन उर्वरीत कामे किती कालावधीत पुर्ण करण्यात येणार आहेत ?

**श्री. राजकुमार बडोले (१३-११-२०१७) :** (१) होय.

(२) सदर २८ स्थळांमध्ये पुढील ऐतिहासीक ठिकाणाचा समावेश आहे :-

१) महाड, जि.रायगड, २) चरी, ता.अलिबाग, रायगड, ३) माता रमाई स्मारक स्मशानभूमी, वरळी, जि.मुंबई, ४) डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारक समिती, किन्हवली, शहापूर, जि.ठाणे, ५) क्रांतीस्तंभ महाड, जि. रायगड ६) कान्फाईकोंड, दापोली, जि. रत्नागिरी, ७) आंबाडवे, ता.मंडणगड, जि. रत्नागिरी, ८) वणंद, ता.दापोली, जि. रत्नागिरी, ९) डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी दिलेली दिक्षाभूमी, चंद्रपूर, १०) बौध्द विहार, भीमघाट, जि.गोंदिया, ११) धम्मकुटी, डव्वा, पळसगाव, जि.गोंदिया, १२) दीक्षाभूमी, देसाईगंज, जि. गडचिरोली, १३) बौध्दविहार, कालीमाटी, अर्जुनीमोर, ता.सडक अर्जुनी, जि.गोदिया, १४) मेव्हणा राजा, देऊळगाव राजा, जि.बुलढाणा (चोखामेळा जन्मस्थान), १५) पातुर्डा, ता. संग्रामपूर, जि. बुलढाणा १६) पुर्णा, बौध्दविहार, जि. परभणी, १७) तदवळे, ता. जि. उस्मानाबाद, १८) मिलिंद कॉलेज जि.औरंगाबाद, १९) तळेगाव दाभाडे, जि.पुणे, २०) लहुजी वस्ताद साळवे यांचे स्मारक, संगमवाडी, जि.पुणे, २१) बौध्दविहार, देहुरोड, जि.पुणे, २२) सावित्रीबाई फुले जन्मगांव, नायगांव, जि.सातारा, २३) एलिमेंटरी स्कुल, जि.सातारा, २४) डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या मातोश्री भिमाबाई यांची समाधी, जि.सातारा, २५) माणगाव, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर, २६) वाटेगाव, ता. वाळवा, जि. सांगली, २७) बौध्दविहार कॅम्प, पुणे,

२८) मौजे हरेगाव, ता.श्रीरामपूर, जि. अहमदनगर

डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनाशी निगडीत असलेल्या स्थळांचा विकास करणे, अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्वाच्या ठिकाणांचा / स्थळांचा विकास करणे हा उद्देश असून, त्याअंतर्गत परिसराचे सुशोभिकरण, मान्यवर व्यक्तीचे स्मारक, सांस्कृतिक भवन, ग्रंथालय, मान्यवर व्यक्तीशी संबंधित जुन्या वास्तुंचे नुतनीकरण करणे इत्यादी बाबींचा सदर शासन निर्णयामध्ये समावेश आहे.

(३) २८ स्थळांचा विकास करण्यासाठी सन २०१६-१७ मधील उपलब्ध रु. २५ कोटी तरतूदीपैकी नियंत्रक अधिकारी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना वितरीत करण्यात आलेली ८० टक्के (रु.२० कोटी) तरतूद आहरित करुन सदरहू निधी ठेव अंशदान स्वरुपात समन्वयक तथा कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, पुणे यांचे अधिनस्त ठेवण्यात आली आहे. सदर स्थळाबाबतचे प्रस्ताव सादर करण्याबाबत संबंधितांना सूचना देण्यात आल्या आहेत.

---

## राज्य हवामान बदल कृती आराखड्याच्या अंमलबजावणीबाबत

**(२८) ३२८७९ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २६९६७ ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जागतिक हवामान बदलाचा राज्यावर होणाऱ्या संभाव्य परिणामाबाबत तज्ञ संस्थेकडून शास्त्रोक्त अहवाल तयार करून घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त अहवालानुसार राज्यात करावयाच्या उपाययोजनांच्या अनुषंगाने संबंधित विभागांचे अभिप्राय शासनास प्राप्त झाले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, निश्चित कृती आराखडा तयार करण्याबाबतच्या धोरणात्मक निर्णय घेण्याविषयीच्या विचाराधीन बाबीवरील शासनाचा विचार पुर्ण झाला आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राज्य हवामान बदल कृती आराखडयाच्या अंमलबजावणीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच प्रस्तुत कार्यवाही केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री. रामदास कदम (०१-११-२०१७) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) व (४) जागतिक हवामान बदलाच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्यासाठी संभाव्य परिणामांचा अभ्यास करुन तयार करण्यात आलेला कृति आराखडा तसेच महाराष्ट्र राज्याचे वातावरणीय बदल अनुकूलन धोरणास दिनांक १०/१०/२०१७ रोजीच्या मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता मिळाली असून महाराष्ट्र राज्याचे वातावरणीय बदल अनुकूलन धोरण क्र. बैठक २०१३/प्र.क्र.६३/तां.क.१, दिनांक २५ ऑक्टोबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे निर्गमित करण्यात आले आहे.

---

## आदिवासी क्षेत्रातील शाळांना अनुदान देण्याबाबत

**(२९) ३२८९० (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २९००२ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) आदिवासी क्षेत्रातील ५० टक्के आदिवासी विद्यार्थी संख्या असलेल्या व आदिवासी विकास विभागाने अनुदान पात्रतेसंदर्भात कार्योत्तर मंजुरी दिलेल्या ९९ शाळांना १०० टक्के अनुदान उपलब्ध करून देण्याबाबत शासनस्तरावरून सुरु असलेली सकारात्मक कार्यवाही पुर्ण झाली आहे काय,
(२) असल्यास, आदिवासी क्षेत्रातील ५० टक्के आदिवासी विद्यार्थी संख्या असलेल्या शाळांना १०० टक्के अनुदान उपलब्ध करून देण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) नसल्यास, सदरहू कार्यवाही केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**ठाणे, मुंबईसह राज्यातील माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची थकीत रक्कम अदा करण्याबाबत**

**(३०) ३२८९१ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २७१०५ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षक व शिक्षकेतरांच्या विविध प्रलंबित प्रकरणांतील एकूण ३१.४९ कोटी रुपयांच्या वेतन अनुदानाबाबत शासनाच्या दिनांक २४ जुन, २०१५ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या चौकशी समितीचा वेतन अनुदानाच्या थकबाकीसंदर्भातील अहवाल शासनास प्राप्त झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, वेतन अनुदानाच्या थकबाकीसंदर्भात चौकशी समितीच्या प्राप्त अहवालाच्या अनुषंगाने शासनस्तरावर सुरु असलेली कार्यवाही पुर्ण झाली आहे काय,
(३) असल्यास, ठाणे, मुंबईसह राज्यातील माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची थकीत रक्कम अदा करण्यासंदर्भात निर्णय घेण्यांत आला आहे, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना थकीत वेतन रक्कम प्रदान करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, सदर वेतन अनुदानाची थकबाकी अदा करण्यासंदर्भातील कार्यवाही केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री. विनोद तावडे (१३-११-२०१७) :** (१) हे खरे आहे.
(२) होय.
(३) हे खरे आहे.
(४) व (५) दिनांक १५/०७/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये अटी व शर्तीच्या अधीन राहून थकीत वेतन अदा करण्याबाबत क्षेत्रिय कार्यालयांना कळविण्यात आले आहे.

---

**राज्यातील अनुदानित शाळांमध्ये मान्यता प्राप्त विनाअनुदान दर्जाच्या तुकडयांचे मुल्यांकन करण्याबाबत**

**(३१) ३३०८३ (११-०८-२०१७). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनुदानित शाळांमध्ये मान्यता प्राप्त विनाअनुदान दर्जाच्या तुकडयांचे मुल्यांकन झाले नसल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले असून या सर्व तुकडया २० टक्के अनुदानास पात्र असूनही त्यांना अनुदान सुरु झालेले नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन या तुकडयांचे मुल्यांकन करुन त्यांना अनुदान सुरु करण्याकरिता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) व (२) सन २००१ पासून विनाअनुदानित शाळा/तुकडया देण्याचे धोरण संपूष्टात आलेले आहे. त्यामुळे अनुदान देण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**केंब्रिज स्कुल (नाशिक) येथे शिक्षण हक्क प्रवेश प्रक्रियेमध्ये अनियमितता झाल्याबाबत**

**(३२) ३३१०१ (११-०८-२०१७). श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंब्रिज स्कुल (नाशिक) येथे शिक्षण हक्क प्रवेश प्रक्रीयेमध्ये बोगस प्रवेश दिल्याचे दिनांक २० मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्‌नुसार शासन आणि पालकांची फसवणूक केल्याप्रकरणी शाळेवर गुन्हा दाखल करण्याबाबत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) शिक्षण हक्क कायदयाचे उल्लंघन केल्याप्रकरणी संस्थेने मुख्याध्यापकांवर जबाबदारी निश्चित करुन त्यांना निलंबित केले आहे. सदर शाळेचे ना हरकत प्रमाणपत्र रद्द करण्याकामी शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक यांनी शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे अहवाल सादर केला आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**महाराष्ट्र ऑलिम्पिक संघटना बरखास्त करण्याबाबत**

**(३३) ३३१३० (११-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विविध क्रीडा संघटनांनी महाराष्ट्र ऑलिम्पिक संघटना बरखास्त करण्याची मागणी केल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले असून जलतरण, जिम्नॅस्टिक्स, अथलेटिक्स, खोखो, रायफल, हँडबॉल या संघटनांचे फेरबदल अहवाल प्रलंबित असताना एमओए सचिवांनी समांतर संघटनांच्या प्रतिनिधींना मतदानास पात्र ठरविले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, केंद्रीय क्रीडा मंत्रालयाने तयार केलेली राष्ट्रीय क्रीडा आचारसंहिता महाराष्ट्रातही लागू करण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१०-११-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

राज्यातील विविध क्रीडा संघटनांनी महाराष्ट्र ऑलिंम्पिक संघटना बरखास्त करण्याची मागणी केलेली आहे. मात्र विविध खेळांच्या संघटनांचे फेरबदल अहवाल वा यानुषंगाने एम.ओ.ए ने केलेल्या कार्यवाही संदर्भात

शासनास अवगत करण्यात आलेले नाही.
(२) व (३) होय.
या अनुषंगाने प्रस्ताव तपासण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात कुशल जोडारी (वेल्डर) आणि वायु कापकाम कारागीर (गॅस कटर) ची गरज भासणार असल्याबाबत**

**(३४) ३३१७१ (११-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सन २०२२ पर्यंत १ लाख ३५ हजार आणि देशात सुमारे ४४ लाख कुशल जोडारी (वेल्डर) आणि वायु कापकाम कारागीर (गॅस कटर) ची गरज भासणार असल्याचे इंडियन इन्स्टिटयूट ऑफ वेल्डिंगने (आयआयडब्ल्यू) सादर केलेल्या अहवालातून माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्याची झळ वाहन, बांधकाम, ऊर्जा निर्मिती आणि इतर मोठया कंपन्यांना ही बसणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (०२-११-२०१७) :** (१) इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ वेल्डिंगने (आयआयडब्ल्यू) सादर केलेला अहवाल प्राप्त झालेला नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ नागपूर संलग्नित महाविद्यालये पुर्ववत सुरु करण्याबाबत

**(३५) ३३१८८ (११-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ नागपूर संलग्नित असणारी १९६ महाविद्यालये कायमची बंद राहणार आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर १९६ महाविद्यालये पुर्ववत सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१३-११-२०१७) :**(१) हे खरे नाही.

(२) विद्यार्थी संख्येचा अभावामुळे संबंधित संस्थेने केलेल्या विनंतीनुसार एकुण १८ महाविद्यालये बंद करण्याची कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अलिबाग (जि.रायगड) नगरपरिषद हद्दीतील शास्त्रीनगर जवळील शौचालयाच्या बांधकामाबाबत

**(३६) ३३१९१ (११-०८-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अलिबाग (जि.रायगड) नगरपरिषद हद्दीतील शास्त्रीनगर व परिसरात लोकसंख्या जास्त असून स्वच्छता अभियान मोहीमेंतर्गत सदर वस्तीसाठी नगरपरिषदेमार्फत निविदा काढून शौचालयाचे काम सुरू करण्यात आले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, राजपूरी बंदर समुह, अलिबाग कार्यालयाचे प्रादेशिक बंदर अधिकारी यांनी सदर शौचालयाचे बांधकाम

थांबविण्याचे आदेश अलिबाग नगरपरिषदेस दिले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर मागासवर्गीय लोकवस्तीसाठी आवश्यक असलेले सार्वजनिक शौचालयाचे बांधकाम थांबविण्याचे वा निष्कासित करण्याचे अधिकार प्रादेशिक बंदर अधिकारी यांना आहेत काय,
(४) असल्यास, स्वच्छता अभियान मोहिमेनुसार सदर ठिकाणी शौचालय बांधण्यासाठी शासन कोणती उपाययोजना करणार आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-११-२०१७) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

बंदर निरिक्षक, महाराष्ट्र सागरी महामंडळ, अलिबाग यांनी शौचालाचे बांधकाम बंद करावे व मेरीटाईम बोर्ड राजापुरी बंदरे समूह, अलिबाग यांच्याकडे परवानगी / नाहरकत प्रमाणपत्र मिळण्यासाठी प्रस्ताव सादर करावा, असे दिनांक २५/०३/२०१७ रोजी नगरपरिषदेस पत्र दिले आहे.
(३) स्वच्छ महाराष्ट्र अभियानांतर्गत नगरविकास विभागाचे दिनांक २८/०७/२०१५ रोजीच्या परिपत्रकानुसार शौचालयाच्या कामास राज्य अथवा केंद्र शासनाच्या कोणत्याही विभागाच्या नाहरकत प्रमाणपत्राची आवश्यकता नाही.
(४) दिनांक २४/०४/२०१७ रोजीच्या पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांना सदरच्या जागेवर बांधण्यात येणाऱ्या शौचालयाच्या कामास स्थगिती न देण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई विद्यापिठातून अभियांत्रिकी पास असलेल्या विद्यार्थीनीचे नांव गॅजेट कॉपीतून वगळलेबाबत

**(३७) ३३२६६ (१०-०८-२०१७). श्री.तानाजी सावंत :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई विद्यापिठातून अभियांत्रिकी करीत असलेली विद्यार्थीनी पास असूनही तिचे गॅजेट कॉपीतून नाव वगळण्यात आल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विद्यापीठाच्या चुकीमुळे सदर पास झालेल्या विद्यार्थीनीचे वर्ष वाया गेल्यामुळे तिला व तिच्या कुटूंबियांना मानसिक त्रास सहन करावा लागला, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधित दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२३-११-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) हे खरे नाही.

कु. श्रध्दा कळंबीकर या यादवराव तासगांवकर अभियांत्रिकी व तंत्रज्ञान संस्था, कर्जत येथील विद्यार्थीनीचा मे, २०१५ मध्ये घेतलेल्या सत्र १ च्या अनुत्तीर्ण विषयासाठीचा परीक्षा प्रवेश अर्ज विहित मुदतीत महाविद्यालयाकडून विद्यापीठास पाठविण्यात आलेला नव्हता. महाविद्यालयाने केलेल्या विनंतीस अनुसरुन विद्यार्थीनीचे शैक्षणिक नुकसान होऊ नये म्हणून विद्यापीठाने सदर अर्ज मुदतीनंतरही स्विकारुन विद्यार्थीनीस अनुत्तीर्ण असलेल्या विषयास बसण्याची परवानगी दिली होती.

विहित मुदतीत अर्ज प्राप्त असलेल्या सर्व विद्यार्थ्यांना परीक्षा प्रवेशपत्र देण्यात आली होती. त्यामध्ये शेवटचा क्रमांक ५८८५०७३ असा होता. तथापि, संगणकाच्या तांत्रिक चुकीमुळे सदर क्रमांक श्री. राहूल वास्के व कु. श्रध्दा कळंबीकर या दोन वेगळ्या महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना दिला गेला व ते विद्यार्थी परीक्षेला बसले.

उक्त परिक्षेचा निकाल दि. १८/०७/२०१५ रोजी जाहीर होऊन त्याच दिवशी संकेतस्थळावर उपलब्ध झाला व दुसऱ्या दिवशी निकालपत्रके संबंधित महाविद्यालयांना पाठविण्यात आली. या निकालात कु. श्रध्दा कळंबीकर हिचा निकाल नव्हता. आसन क्रमांक ५८८५०७३ वर श्री. राहूल वास्के याचा निकाल होता. तो मागील सत्रात घेतलेल्या परिक्षेत पुनर्मुल्यांकनामध्ये उत्तीर्ण झाला असल्याने त्याच्या निकालासंदर्भात Seat No. ५८८५०७३ is Reserve due to previously pass हा अभिप्राय दिला होता.

त्यावेळी कु. श्रध्दा कळंबीकर या विद्यार्थीनीने मागील सत्रात ती परिक्षेत उत्तीर्ण नसल्याचे माहित असूनही तिच्या नावापुढे हा अभिप्राय कसा

लिहिण्यात आला याबाबत महाविद्यालयाकडून आणि विद्यापीठाकडून शहानिशा न करता संबंधित महाविद्यालयास उक्त प्रत सादर करुन अभ्यासक्रमाच्या शेवटच्या वर्षापर्यंत प्रवेश मिळविला. त्यानंतर मे २०१७ मध्ये सदर विद्यार्थीनीने ही बाब विद्यापीठ प्रशासनाच्या निदर्शनास आणून दिली. त्यानंतर विद्यापीठाने त्या विद्यार्थीनीने सत्र-१ परिक्षेच्या या विषयात मिळविलेले २४ गुण विचारात घेऊन तिचा निकाल अनुत्तीर्ण म्हणून घोषित केला.

अशा प्रकारे सदर विद्यार्थीनीला संकेतस्थळावरील निकालपत्रावरुन तांत्रिक चुकीची जाणीव असतांना व परीक्षा अनुत्तीर्ण असूनसुध्दा तिने सत्र ५ व ८ ला पात्र नसतांना प्रवेश घेतलेला आहे. त्यामुळे तिचे कोणतेही शैक्षणिक नुकसान झालेले नाही. उलटपक्षी तिने विद्यापीठाकडून झालेल्या तांत्रिक चूकीचा गैरफायदा घेऊन पात्र नसतांना पुढील वर्गात प्रवेश मिळविलेला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे खर्डी (ता.माणगांव, जि.रायगड) येथील क्रीडा संकुलाच्या दुरुस्तीसाठी आर्थिक तरतूद करण्याबाबत**

**(३८) ३३३१७ (११-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे खर्डी (ता.माणगांव, जि.रायगड) येथील क्रीडा संकुलाच्या देखभाल दुरुस्तीसाठी आर्थिक तरतूद करणेबाबत लोकप्रतिनिधींनी दिनांक १९ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास मा.क्रीडा व युवक कल्याण मंत्री यांच्याकडे पत्रव्यवहार केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उक्त पत्राच्या अनुषंगाने आर्थिक तरतूद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात आली,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, माणगांव यांचेकडून तालुका क्रीडा संकुल माणगांवच्या दुरुस्तीच्या तसेच नव्याने काही बाबी करण्याच्या कामाचे अंदाजपत्रक व आराखडे तयार करण्यात आले आहेत. सद्य:स्थितीत संकुल समितीकडे शिल्लक असलेल्या निधीतून सदरची कामे करुन घेणे प्रस्तावित असून तालुका क्रीडा संकुल समितीच्या आगामी बैठकीत यावर निर्णय घेऊन पुढील कार्यवाही करण्यात येणार आहे. तसेच शासन निर्णय दिनांक २३ मार्च, २००३ नुसार तालुका क्रीडा संकुल देखभालासाठी प्रतिवर्षी रु. ३.०० लक्ष अनुदान देण्यात येते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात कायम विना अनुदानित शाळा व वर्ग तुकड्यांना अनुदान देण्याबाबत**

**(३९) ३३४८९ (११-०८-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, डॉ.सुधीर तांबे, श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक २८५४७ ला दिनांक २५ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात कायम विनाअनुदानित तत्वावर परवानगी दिलेल्या प्राथमिक व माध्यमिकच्या शाळा व वर्ग तुकड्या अनुदानासाठी पात्र म्हणून दिनांक १ व २ जुलै, २०१६ रोजी जाहिर करण्यात आल्या असून सदर पात्र शाळांना अनुदान मिळणेबाबत लोकप्रतिनिधी व संघटना यांच्याकडून विचारणा करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शाळा व वर्ग तुकड्यांना अनुदान देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (३१-१०-२०१७) :** (१) होय.

(२) दिनांक १ व २ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयान्वये मूल्यांकनात पात्र घोषित करण्यात आलेल्या शाळांना अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**बीड जिल्हयात इंग्रजी शाळांमध्ये आरटीई योजना राबविण्याबाबत**

**(४०) ३३९३९ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बीड जिल्हयात इंग्रजी शाळांमध्ये आरटीई योजनेंतर्गत २५ टक्के कोटयातुन किती विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जातो तसेच दिनांक १० जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास आरटीई योजनेंतर्गत किती विद्यार्थ्यांना मोफत प्रवेश दिला आहे,

(२) असल्यास, सदरील योजनेतील दुसरी फेरी पूर्ण न केल्याने अनेक मुलांचे प्रवेश प्रलंबित असून आरटीई योजनेंतर्गत प्रवेशासाठी दिरंगाई केली जाते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आरटीई योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०९-११-२०१७)** : (१) बीड जिल्हयातील १८१ निकषपात्र शाळांच्या २५ टक्के मोफत प्रवेश क्षमतेनुसार २१९४ विद्यार्थ्यांना प्रवेश देता येवू शकतो. ऑनलाईन प्रवेश प्रक्रियेद्वारे १३७४ विद्यार्थ्यांचे प्रवेश झालेले आहेत.

(२) हे खरे नाही.

ऑनलाईन प्रवेशासाठी विहित कालावधीत ज्या पालकांनी आपल्या पाल्यांचे प्रवेश अर्ज भरले होते. त्यांच्यासाठी प्रवेशाची लॉटरी सिस्टीमप्रमाणे ५ फेऱ्या पूर्ण करण्यात आल्या आहेत.

(३) आरटीई योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी शासनाने ऑनलाईन प्रवेश प्रक्रिया सुरु केली आहे. योजनेच्या यशस्वीतेसाठी शाळा व्यवस्थापन, पालक यांना ऑनलाईन रजिस्ट्रेशन करण्यासाठी विहित कालावधी निश्चित करुन दिलेला होता. योजनेचा प्रसार आणि प्रसिध्दीसाठी राज्यस्तरावरुन जिल्हा स्तरावर विविध दैनिकामधून प्रसिध्दी देवून जागृती केली जात आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे खडपोली (ता.चिपळूण, जि.रत्नागिरी) येथील भुखंडाच्या विकासासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**(४१) ३४००१ (१९-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे खडपोली (ता.चिपळूण, जि.रत्नागिरी) येथील महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने क्रिडांगण, बगीचा व वृक्ष लागवडीसाठी आरक्षित असलेल्या भुखंडाचा विकास करण्यासाठी निधी उपलब्ध होणेबाबत दिनांक ६ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास मा.उद्योग मंत्री यांचेकडे पत्राद्वारे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू पत्राच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, किती निधीची तरतूद करण्यात आली आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (०७-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

याबाबतचे निवेदने मा.मंत्री (उद्योग) यांचे कार्यालयास प्राप्त झालेले नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील इंग्रजी माध्यमाच्या कॉन्व्हेंटच्या शाळांमध्ये २५ टक्के कोटा वंचित घटकाच्या मुलांकरीता राखीव ठेवण्याबाबत**

**(४२) ३४०३५ (१८-०८-२०१७). श्री.परिणय फुके : तारांकित प्रश्न क्रमांक २७०६१ ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील इंग्रजी माध्यमाच्या कॉन्व्हेंटच्या शाळांमध्ये २५ टक्के कोटा वंचित घटकाच्या मुलांकरीता राखीव ठेवण्याचा निर्णय शासनाने दिनांक १३ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास घेतल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर प्रक्रियांची अंमलबजावणी लागू करुन प्रवेश न देणा-या शाळावर व संस्थावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे, तसेच माहे जून, २०१७ पर्यंत किती शाळांवर कार्यवाही करण्यात आली,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०९-११-२०१७) :** (१) राज्यात बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ हा दुर्बल व वंचित घटकातील ६ ते १४ वयोगटाच्या विद्यार्थ्यांसाठी दि. १ एप्रिल, २०१० पासून लागू करण्यात आला आहे. सन २०१२-१३ या शैक्षणिक वर्षापासून राज्यातील सर्व प्रकारच्या विना अनुदानित शाळांमध्ये दुर्बल व वंचित गटातील बालकांना प्रवेश स्तरावर २५ टक्के प्रवेश राखीव ठेवण्याच्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यात येत आहे.
(२) दुर्बल व वंचित गटातील बालकांना प्रवेश स्तरावर २५ टक्के प्रवेश न देणाऱ्या शाळांवर व संस्थांवर बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ कायद्यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येते.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**शिक्षक पात्रता परीक्षा टी.ई.टी. गृहीत ठरविण्याबाबत**

**(४३) ३४०७२ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक २९९७३ ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शिक्षक पात्रता परीक्षा (टी.ई.टी.) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम, २००९ मध्ये आवश्यक अहर्ता म्हणून समजली गेली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कार्यरत शिक्षकांना व शिक्षण सेवकांना टी.ई.टी. आवश्यक ठरविण्यामागे कोणता उद्देश आहे,

(३) असल्यास, टी.ई.टी. २००९ मधील कलम २३ तसेच नियम, २०११ मधील नियम १६ व १७ नुसार शिक्षकांना तसेच शिक्षण सेवकांना शासन ५ वर्षाची मुदत देणार आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कार्यरत शिक्षकांना टी.ई.टी. च्या पूर्वतयारीस्तव सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०३-११-२०१७) :** (१) सदर अधिनियमाच्या कलम २३ नुसार शिक्षक पदावर नियुक्तीसाठी पात्रता व सेवाशर्ती ठरविण्यासाठी केंद्र शासनाने दि. ३१/०३/२०१० च्या अधिसूचनेन्वये शैक्षणिक प्राधिकरण म्हणून घोषित केलेल्या राष्ट्रीय शिक्षक शिक्षण परिषदेने शिक्षक पदाकरिता शिक्षक पात्रता परीक्षा (टीईटी) अनिवार्य केली आहे, हे खरे आहे.
(२) राज्यातील सर्व प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्यांना गुणात्मक व दर्जेदार शिक्षण देण्याकरिता सर्वोच्च गुणवत्तेचे शिक्षक मिळावेत, असा उद्देश आहे.
(३) व (४) प्राथमिक शिक्षक पदाकरिता आवश्यक असलेली विहीत व्यावसायिक अहर्ता प्राप्त करण्याकरिता सेवांतर्गत शिक्षक पात्रता परीक्षा (टीईटी) तीन संधीमध्ये उत्तीर्ण करण्याबाबतच्या सूचना दि. ३०/६/२०१६ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत, तथापि अप्रशिक्षित शिक्षकांना प्रशिक्षित होण्यासाठी दि. २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ शासन निर्णय दि. ०९/०२/२०१६ अन्वये देण्यात आलेली आहे. तसेच शिक्षक पात्रता परीक्षा (टीईटी) ही स्पर्धात्मक स्वरुपाची परीक्षा असून त्याकरिता पूर्व तयारीस्तव सुविधा उपलब्ध करुन देण्याचा मुद्दा शासन स्तरावर उपस्थित होत नाही.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात विनाअनुदानित अध्यापक विद्यालयातील शिक्षकांना वेतन देण्याबाबत

**(४४) ३४१७५ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाने सन १९८० ते २००१ या दरम्यान मान्यता दिलेल्या विनाअनुदानित अध्यापक विद्यालयांना (डी.एड्.) मान्यता दिल्या होत्या, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यामध्ये मराठी, हिंदी, कन्नड इत्यादी माध्यमाची एकूण ११५ विनाअनुदानित अध्यापक विद्यालये (डी.एड्.) तसेच ११५ विद्यालयाच्या १३७ तुकड्या असून कार्यरत विनाअनुदानित अध्यापक विद्यालयातील शिक्षक मागील ३० ते ३५ वर्षापासून वेतनापासून वंचित आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, कार्यरत विद्यालयातील शिक्षकांनी त्यांच्या मागण्यांकरीता दिनांक १८ जानेवारी, २०१६ पासून आझाद मैदान, मुंबई येथे आमरण उपोषणला बसल्याबाबतचे निवेदन मा.मुख्यमंत्री, मा.शालेय शिक्षण मंत्री, मा.वित्त मंत्री व संचालक यांना दिले, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षकांना अनुदान देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०१-११-२०१७) :** (१) होय.
(२) अंशत: खरे आहे. विनाअनुदानित शिक्षकांना वेतन देण्याची जबाबदारी ही संबंधित संस्थेची आहे.
(३) होय.
(४) विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यात आलेल्या अध्यापक विद्यालयांना अनुदान देण्याबाबतचा कोणताही प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात टी.ई.टी. परीक्षा उत्तीर्ण असलेल्यांना सेवेत समाविष्ट करण्याबाबत**

**(४५) ३४१८५ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यामध्ये शिक्षण अधिकार अधिनियम, २००९ नुसार प्राथमिक व माध्यमिक शाळेमध्ये गुणवत्ताधारक शिक्षक नेमले जावे याकरिता शासनाने

सन २०१३ व २०१४ मध्ये टी.ई.टी. शिक्षक पात्रता परीक्षा घेतली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यामध्ये सन २०१० पासून शिक्षक भरती केली नसल्याने सन २०१३ व सन २०१४ मध्ये टी.ई.टी. परीक्षा उत्तीर्ण झालेल्यांना अद्यापपर्यंत नोकऱ्यांमध्ये/सेवेमध्ये समाविष्ट करण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यामध्ये ६० ते ७० हजार शिक्षकांची पदे रिक्त असून सुध्दा टी.ई.टी. परीक्षा उत्तीर्ण असलेल्यांना सेवेत समाविष्ट करण्याविषयी शासनाचे धोरण काय आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षक भरती प्रक्रिया चालू करण्याविषयी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०३-११-२०१७) :** (१) होय.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्था तसेच खाजगी शैक्षणिक संस्थांच्या अनुदानित, अंशत: अनुदानित तसेच अनुदानास पात्र घोषित केलेल्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक भरती अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी मधील गुणांच्या आधारावर करण्याबाबत शासन निर्णय, दि. २३/०६/२०१७ रोजी पारित करण्यात आलेला आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे खारीवली (ता.वाडा, जि.पालघर) येथील ओढे व नाले यांचे प्रवाह बदलून नदीत बांधकाम केल्याबाबत

**(४६) ३४२२९ (११-०८-२०१७). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१)  मौजे खारीवली (ता.वाडा, जि.पालघर) येथील ओढे व नाले यांचे प्रवाह बदलून नदीत बांधकाम केल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पर्यावरण विभागाच्या परवानगीनुसार बांधकाम न केल्याने संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. रामदास कदम (१८-११-२०१७) :** (१) व (२)  हे खरे  नाही.

तथापि, मे.अंचावियो रिसॉर्ट मौजे खरीवली, ता.वाडा येथे महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळामार्फत दिनांक ३१/७/२०१७ रोजी स्थळभेट दिली असता, सदर रिसॉर्ट हा नदी पात्रालगत बांधलेला आढळून आलेला. तसेच सदर रिसॉर्टने महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाचे संमतीपत्र घेतलेले नाही. याकरिता प्रादेशिक अधिकारी, कल्याण यांनी दिनांक ०१/०८/२०१७ रोजी रिसॉर्ट व्यवस्थापनास कारणे दाखवा नोटीस बजाविली आहे.
(३)  प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात आयटीआय मधील पदांची निर्मिती करणेबाबत

**(४७) ३४२४१ (१८-०८-२०१७).  श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात मागील १० वर्षामध्ये प्रत्येक तालुक्यात नवीन आयटीआय तसेच तांत्रिक विद्यालय सुरु करण्यात आली त्यामुळे व्यवसायाचा विकास झाला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास,  व्यवसाय निहाय शिल्प निदेशक/ शिक्षक / भांडारपाल / वसतिगृह अधिक्षक / कनिष्ठ लिपिक / वरिष्ठ लिपिक / मुख्य लिपिक / चौकीदार / कर्मशाळा परिचर इत्यादी कार्यालयीन पदाची निर्मिती झाली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या पदाच्या निर्मितीबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (०२-११-२०१७) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.

राज्यामध्ये मागील १० वर्षात ३८ औ. प्र. संस्था सुरू करण्यात आलेल्या आहेत. तसेच ३४ शासकीय तांत्रिक विद्यालय सुरू करण्यात आलेली आहे.

(२) व (३) होय, हे अंशत: खरे आहे.

औद्योगिक प्रशिक्षण संस्थांकरिता पदनिर्मिती करण्यात आलेली आहे. राज्यातील ३२ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. आयटीआय-१००६/(४२/०६)/व्यशि-२, दि. २१/०९/२००६ अन्वये ५७६ पदांच्या निर्मितीस मान्यता देण्यात आली आहेत.

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. ईबीसी-२००५/प्र.क्र.२९५/मावक-२, दि. ०९/०१/२००६ अन्वये मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या सहा विभागासाठी विशेष घटक योजनेंतर्गत उच्चस्तर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करण्यास मान्यता देण्यता आली आहे. त्याप्रमाणे शासन निर्णय क्र. ईबीसी-२००४/ प्र.क्र. ५/मावक-२, दि. ०९/०१/२००६ अन्वये नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या चार विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करण्यासाठी प्रत्येकी ३२ याप्रमाणे १२८ पदांना मान्यता देण्यात आली आहे.

राज्यातील अल्पसंख्यांक बहुल भागात उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. आयटीआय-२००९/(११/०९)/व्यशि-३, दि. २९/०८/२००९ अन्वये बृहन्मुंबईमध्ये नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था मांडवी व नेहरूनगर या संस्था सुरू करण्यात आल्या आहेत व सदर संस्थांसाठी ३७ शिक्षकीय व ३० शिक्षकेतर पदांना मंजूर देण्यात आली आहे.

तसेच ३४ शासकीय तांत्रिक विद्यालयापैकी प्रत्यक्ष प्रवेश देण्यात आलेल्या ३१ संस्थासाठी शासन निर्णय क्र. व्हीओसी-२००९/प्र.क्र.१४ /०९/व्यशि-४, दि. ०४/०५/२०११ अन्वये ११६ शिक्षकीय व १६ शिक्षकेतर अशी एकूण १३२ पदे नियमित वेतनश्रेणीवर निर्माण करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. परंतू अद्यापपर्यंत ८७ पदांची पदनिर्मिती झालेली नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**जागेच्या खरेदी व्यवहारात जागा मालकाने फसवणुक केल्याबाबत**

**(४८) ३४६४४ (२४-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) श्रीमती शितल मळेकर, रा.गिरगांव, मुंबई यांच्या फ्लॅट क्र. ११/बी, सतगुरु अपार्टमेंट, गोकुळनगर, ठाणे (प.) या जागेच्या खरेदी व्यवहारात श्री. सुनिल मारुती पळसकर या जागा मालकाने फसवणुक केल्याची घटना माहे जून, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू प्रकरणी श्रीमती मळेकर यांनी ठाणे येथील राबोडी पोलीस स्थानकात रितसर तक्रार दाखल केली असून त्याप्रकरणी एफ.आय.आर ही दाखल करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त एफ.आय.आर घेण्यास स्थानिक पोलिसांनी एक वर्षाचा विलंब लावला असून पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्याकडे सुध्दा तक्रार अर्ज दाखल केला होता, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, श्रीमती मळेकर यांनी सदर प्रकरणी दाखल केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने त्यांची फसवणूक झालेली रक्कम त्यांना परत मिळवून देण्याबाबत स्थानिक पोलिसांनी अद्याप कोणतीही कारवाई केली नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, सदरहू प्रकरणी फसवणूक करणाऱ्या संबंधित घरमालक व पोलीस अधिकारी व कर्मचाऱ्यांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०२-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३), (४) व (५) सदर प्रकरणी एफ.आय.आर. घेण्यास उशिर झालेला नाही. अर्जदार यांनी गैरअर्जदार यांचेविरोधात दि. १८/०६/२०१५ रोजी दिलेल्या तक्रारीवरुन चौकशीअंती राबोडी पोलीस ठाण्यात गु.र.नं. I १४३/१६, भा.दं.वि. ४२०, ४०६ अन्वये गुन्हा दाखल असून आरोपीस अटक केली आहे.

प्रस्तुत प्रकरण तपासाधीन आहे.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## भुसावळ (जि.जळगांव) जिल्हा परिषद शाळांमधील पटसंख्येत घट होत असल्याबाबत

**(४९) ४६३२५ (२७-०१-२०१४). डॉ.सुधीर तांबे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भुसावळ तालुक्यातील (जि.जळगाव) जिल्हापरिषद शाळांमधील पटसंख्येत गेल्या ६ वर्षात सरासरी सुमारे ४० टक्के घट झाली असल्याची बाब निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, भुसावळ (जि.जळगाव) येथील जिल्हापरिषद शाळांमध्ये गेल्या ६ वर्षात सातत्याने घट होत असल्याची कारणे कोणती आहेत,

(३) असल्यास, भुसावळ तालुक्यातील जिल्हापरिषदेच्या शाळांमध्ये विद्यार्थी संख्या वाढविणेबाबत व जे विद्यार्थी सद्या या शाळांमध्ये शिकत आहे त्यांना टिकविणेसाठी कोणत्या विशेष उपाययोजना करण्यात आल्या व येत आहेत,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२४-११-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) भुसावळ व भुसावळ तालुक्यातील खाजगी व्यवस्थापनाच्या तसेच स्वयंअर्थसहाय्यीत शाळांच्या संख्येत वाढ होत असल्याने तसेच पालकांचा कल पाल्यांना खाजगी व्यवस्थापनाच्या इंग्रजी व सेमी इंग्रजी माध्यमाच्या शाळेत प्रवेश घेण्याचा असल्याने जिल्हा परिषद शाळांच्या पटसंख्येत घट होत आहे.

(३) भुसावळ तालुक्यातील जिल्हा परिषद शाळांमध्ये विद्यार्थी संख्या वाढविण्यासाठी पालकांच्या भेटी, पालक मेळावे, पालक शिक्षक संघ यांच्या बैठका घेऊन पाटनोंदणी पंधरवडा साजरा केला जातो. तसेच जिल्हा परिषद शाळांना भौतिक व शैक्षणिक सुविधा पुरविण्यात येत आहेत. शिक्षकांचे उदबोधन करुन गुणवत्तापूर्ण दर्जेदार शिक्षण देण्याचा प्रयत्न करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रायगड जिल्ह्यातील जिल्हा परिषदेच्या शाळांची पटसंख्या कमी होत असल्याबाबत

**(५०) ४६६७४ (३०-०१-२०१४). श्री.अनिल तटकरे, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड जिल्ह्यातील जिल्हा परिषदेच्या शाळांची पटसंख्या कमी होत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१३ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, पटसंख्या वाढविण्यासाठी शासनामार्फत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) अद्याप कोणतीच उपाययोजना केली नसल्यास कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२४-११-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) १. खाजगी शाळांची स्पर्धा.

२. मुलांना इंग्रजी माध्यमांत प्रवेश देण्याच्या पालकांच्या मानसिकतेमुळे जिल्हा परिषद शाळेतील पटसंख्या कमी होत आहे.

(३) व (४) मुलांना मोफत प्रवेश, मोफत शिक्षण, मध्यान्ह भोजन योजना, मुलांना मोफत गणवेश, पाठ्यपुस्तकांचे मोफत वाटप, चांगल्या भौतीक सुविधा, जिल्हा परिषद सेस मधून बेंचेसची व्यवस्था, स्पर्धात्मक कार्यक्रम उद. क्रीडा स्पर्धा, विज्ञान प्रदर्शन, संस्कार शिबीरे इत्यादी सारख्या उपाययोजना शासन/जिल्हा परिषदेमार्फत दर वर्षी राबविण्यात येतात.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**
**नागपूर.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, नागपूर